अधू शासकीय कर्मचा–यांना कार्यालयाच्या वेळेमध्ये सवलत देणेबाबत_

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई
शासन निर्णय क्र.संकीर्ण–1083/23/18 दिनांक 30 जुलै 1985

पहा – दिनांक 12 फेब्रुवारी 1980 चा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.एमआयएस 1080/2/18 व दिनांक 14 ऑगस्ट चा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एम आय एस 1081/73/18

शासन निर्णय :– मुंबईतील शासकीय कार्यालयातील अधू कर्मचा–यांना कार्यालयाच्या वेळेमध्ये सवलत देण्यासंबंधीचे आदेश दिनांक 12 फेब्रुवारी 1980 व दिनांक 14 ऑगस्ट 1981 च्या उपरोक्त शासन निर्णयान्वये देण्यात आलेली आहे. अशाच प्रकारची सवलत राज्यातील इतर महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय कार्यालयातील कर्मचा–यांना देण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने अधू कर्मचा–यांच्या समस्येचा सांगोपांग विचार करुन आता असा निर्णय घेतला आहे की, कायमचे अधूत्व असलेल्या शासकीय कर्मचा–यांना कार्यालयामध्ये येण्यासाठी सकाळी अर्धा तास किंवा संध्याकाळी अर्धा तास स्थानिक प्रश्नाची निकड व गरज लक्षात घेवून सवलत देण्यात यावी. ही सवलत महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय कार्यालयापुरतीच मर्यादित ठेवण्यात यावी.

2 ही सवलत घेणा–या अधू कर्मचा–यांनी –

अ जिल्हा रुग्णालयाच्या अस्थिव्यंग शल्यचिकित्सकाकडून कमीत कमी 40 टक्के / अंशीक अधूत्व असल्याचा दाखला त्यांच्या शिफारशी पत्रासह व

ब – डोळ्याने / नी अधू असलेल्या कर्मचा–यांनी जिल्हा रुग्णालयातील नेत्रोपचार / नेत्रचिकित्सा विभागाच्या प्रभारी शल्य चिकित्सकांचा दाखला व शिफारस पत्र आपल्या अर्जासोबत जोडावे.

3 अधू कर्मचा–यांना अशा त–हेची सवलत देण्याचे अधिकार विभाग प्रमुखांना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

ज.ज. ताम्हणकर

अवर सचिव,
महाराष्ट्र शासन पुणे

GR-20020919163645000-1500